**“नायगाव, ता.वसई ,जि.पालघर येथे पाईल जेट्टी बांधणे” या कामाच्या रु. ११,२३,९८,५३१/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकिय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण ०८२१/प्र.क्र.२७/बंदरे-१**
गृह विभाग, मंत्रालय
मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ६ एप्रिल, २०२२

वाचा :- मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांचे पत्र क्र.
१) ममेबो/मुकाअ/अभि-१/२०२१-२२/२५७९, दिनांक १/७/२०२१
२) ममेबो/मुकाअ/अभि-१/ नायगाव/४३१८, दिनांक २१.१०.२०२१

प्रस्तावना:-

पालघर जिल्ह्यातील, नायगाव हे खाडी किनारी वसलेले गाव आहे. नायगाव येथे प्रवासी जेट्टी अस्तित्वात असून या जेट्टीवरुन पाणजू या बेटावर ये-जा करण्याकरिता स्थानिक वापर करतात. पाणजू बेटावरील लोकसंख्या अंदाजे तीन हजार असून, तेथील रहिवाश्यांना शहरात येण्याकरिता हा एकच मार्ग उपलब्ध होता. नायगाव ते पाणजू दरम्यान आतापर्यंत प्रवासी वाहतूक होत आहे. पाणजू बेटावरील स्थानिकांना शिक्षण, दवाखाना तसेच वेगवेळ्या दैनंदिन कामकाजाकरिता नायगाव मार्गेच यावे लागते. याकरीता सन २०२० मध्ये पाणजू बेटावर पाईल जेट्टीचे काम पूर्ण करण्यात आलेले आहे. तसेच सद्यस्थितीत नायगाव येथे अस्तित्वात असलेल्या जेट्टीवर ओहोटीच्या वेळी बोटी लागताना, तसेच प्रवासी चढ-उतार करण्याकरिता अडचण अद्भवत असल्याने नायगाव येथे पाईल जेट्टी प्रस्तावित करण्यात आली आहे.

“नायगाव, ता.वसई, जि.पालघर येथे पाईल जेट्टी बांधणे” या कामासाठी रु. ११,२३,९८,५३१/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकिय मान्यता प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

“नायगाव, ता.वसई ,जि.पालघर येथे पाईल जेट्टी बांधणे” या कामासाठी रु. ११,२३,९८,५३१/-(अक्षरी रुपये अकरा कोटी तेवीस लक्ष अठ्ठयाण्णव हजार पाचशे एकतीस) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकिय मान्यता देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक :- विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७/४/२०१५ चे परिशिष्ट वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग-तीन अ.क्र.१ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) मधील तरतूदींचे पालन होईल याबाबत महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांनी खात्री करावी.

३. वरील कामांवरील खर्च "मागणी क्र. बी-७, लेखाशीर्ष क्र.३०५१- बंदरे व दिपगृहे, (०२) लहान बंदरे, (१९०) सार्वजनिक उपक्रम व इतर उपक्रमांना सहाय्य, (००) (०२) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास सहायक अनुदान-तरंगती जेट्टी व तत्सम प्रवाशी सुविधा उभारणे (३०५१ १८३५), ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान" या लेखाशिर्षाखाली मंजुर तरतुदीतुन भागविण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.६/रा.मं.२, दिनांक ११.०२.२०२२, नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ५०/१४६१, दिनांक २५.०२.२०२२ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१३५/२०२२/व्यय-८, दिनांक २४.०३.२०२२ अन्वये निर्गमीत करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०४०७११४६१७०६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA MOTIRAM HOLKAR

Digitally signed by RAJENDRA MOTIRAM HOLKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ac1bf43d6978ca6d925e9240f8c09bf2f3128ad5d62a0dd7d57d2b72c9ea41f4, pseudonym=D247A5CA6B26BCB0990C6082FBF829BF9C8E55B1, serialNumber=48F41D082A9DD86B54CCCF5B4C6A83A6132C3F6F06A9940BD960612800458BA7, cn=RAJENDRA MOTIRAM HOLKAR
Date: 2022.04.07 11:46:36 +05'30'

**( रा. मों. होळकर )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (बंदरे) यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री (बंदरे) यांचे खाजगी सचिव.
३. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई-३२.
७. नियोजन विभाग (का. १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
८. अपर मुख्य सचिव (बंदरे), मंत्रालय, मुंबई,
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई
१०. निवडनस्ती(बंदरे-१)